३०-३१ ऑगस्ट, २०२० व १ सप्टेंबर, २०२० रोजी नागपूर विभागात निर्माण झालेल्या पुरपरिस्थितीमुळे बाधित झालेल्या व्यक्तींना मदत वाटप करण्यासाठी निधी वितरित करण्याबाबत ....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र. २४१/म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०४ सप्टेंबर, २०२०

संदर्भ : १) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक : सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३,दि.१३.०५.२०१५
२) शासन निर्णय, महसुल व वन विभाग,क्रमांक सीएलएस-२०१७/प्र.क्र.२६७/म-३,दि.२५.०१.२०१८
३) विभागीय आयुक्त,नागपूर यांचे पत्र क्र.मशा -७(५)/नै.आ.व्य/कावि-६४९/२०२०,दि. ०२.०९.२०२०

प्रस्तावना:

३०-३१ ऑगस्ट, २०२० व १ सप्टेंबर, २०२० रोजी नागपूर विभागात निर्माण झालेल्या पुर परिस्थितीमध्ये बाधित झालेल्या नागरिकांना तातडीने सानुग्रह अनुदान, घर पडझडीसाठी मदत वाटप करण्यासाठी तसेच मदत छावण्यांमध्ये दाखल नागरिकांना अन्न,पाणी व वैद्यकीय देखभाल इ. सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये निधी वितरित करण्याची मागणी केली आहे. राज्य कार्यकारी समितीच्या दि. ४.९.२०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये समितीने मंजूर केल्यानुसार या प्रकरणी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

३०-३१ ऑगस्ट, २०२० व १ सप्टेंबर, २०२० रोजी नागपूर विभागात निर्माण झालेल्या पुर परिस्थितीमध्ये बाधित झालेल्या नागरिकांना तातडीने सानुग्रह अनुदान, घर पडझडीसाठी मदत व मदत छावण्यांकरिता विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये केलेली मागणी व राज्य कार्यकारी समितीने दिलेल्या मान्यतेनुसार राज्य आपत्ती प्रतिसाद निधी मधून जिल्हानिहाय संबंधित लेखाशीर्षाखाली एकूण रू १६४८.२५ लक्ष ( रूपये सोळा कोटी अठ्ठेचाळीस लाख पंचवीस हजार फक्त) इतका निधी खालीलप्रमाणे मंजूर करण्यात येत आहे.

**(रक्कम रूपये लाखात)**

| जिल्हा | मृत व्यक्तींच्या कुटुंबियांना सहाय्य व जखमी व्यक्तींना मदत तसेच नैसर्गिक आपत्तीमध्ये २ दिवसापेक्षा अधिक कालावधीकरिता क्षेत्र पाण्यात बुडाले असल्यास /घरे पुर्णत: वाहून गेली असल्यास/ पुर्णत: क्षती ग्रस्त झाली असल्यास कपडे /भांडी /घरगुती वस्तुंकरिता अर्थसहाय्य (२२४५ ०१५५) | पुर्णत: नष्ट/मोठया प्रमाणावर / अंशत: पडझड झालेली कच्ची / पक्की घरे, नष्ट झालेल्या झोपडया यांना अर्थसहाय्य (२२४५ ०२७१ ) | मदत छावण्या चालविण्यासाठी (२२४५ ०२१७) | एकूण मंजूर निधी |
|---|---|---|---|---|
| नागपूर | २५०.०० | २४०.०० | १०.०० | **५००.००** |
| वर्धा | २.२५ | ० | ० | **०२.२५** |
| भंडारा | २८०.०० | २००.०० | २०.०० | **५००.००** |
| गोंदिया | ७५.०० | २५.०० | ० | **१००.००** |
| चंद्रपूर | २५०.०० | २४०.०० | १०.०० | **५००.००** |
| गडचिरोली | २९.०० | १०.०० | ७.०० | **४६.००** |
| **एकूण** | **८८६.२५** | **७१५.००** | **४७.००** | **१६४८.२५** |

उपरोक्त निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्त, नागपूर यांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

२. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील सुचनांचे, निकषांचे ,अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच संदर्भाधीन शासन निर्णयात विहित केलेल्या दरानुसार मदतीचे प्रदान करण्यात यावे. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये रक्कम बीम्स प्रणालीवर वितरित करण्यात येत असली तरी, लाभार्थी निश्चित झाल्यानंतर वित्तिय शिस्तीच्या दृष्टीकोनातून संबंधित जिल्हाधिकारी यांनी प्रत्यक्ष गरजेनुसारच कोषागारातून रक्कम आहरित करून त्यानंतरच रक्कम लाभार्थ्यांच्या थेट बँक खात्यामध्ये ऑनलाईन पध्दतीने हस्तातंरित करावी. सदर निधी अनावश्यकरित्या कोषागारातून आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा. या सुचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

४. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

५. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत वरील विवरणपत्रात दर्शविलेल्या सर्व उप/गौण शिर्षाखाली निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:१९४/व्यय-९/२०२०, दिनांक ०४.०९.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००९०४१६४६०७०४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.09.04 17:19:52 +05'30'

**( सु. ह. उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. विभागीय आयुक्त,नागपूर
४. जिल्हाधिकारी, नागपूर/वर्धा/भंडारा/गोंदिया/चंद्रपूर/गडचिरोली
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,

७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/वर्धा/भंडारा/गोंदिया/चंद्रपूर/गडचिरोली
८. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
९. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१०. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
११. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१२. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१३. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ ).